शाळा प्रवेशासाठी बालकाचे
किमान वय निश्चित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांक:आरटीई-२०१८/प्र.क्र.१८०/एस.डी-१**

मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ:-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.पीआरई-२०१०/(११५)/प्राशि-१, दिनांक ११ जून, २०१०

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.: आरटीई-९८१४/प्र.क्र.१६०/एस.डी-१, दिनांक २१ जानेवारी, २०१५, दिनांक २३ जानेवारी, २०१५, दिनांक २५ जानेवारी, २०१७

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.: आरटीई -२०१९/प्र.क्र.११९/एस.डी.-१, दि.२५ जुलै, २०१९

४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.प्राशिसं/आरटीई-५२०/ बालकाचे वय/२०२०/९०९, दि.१८ फेब्रुवारी, २०२०

**प्रस्तावना:-**

शासनाने दि.११ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये शाळा प्रवेशाबाबतची कार्यपध्दती निश्चित केलेली आहे. सदर शासन निर्णयात प्रवेशाबाबतच्या इतर तरतूदीबरोबरच शाळा प्रवेशासाठी बालकाचे वयाबाबतची तरतूद आहे. सदर तरतूदीनुसार इयत्ता १ ली मधील प्रवेशासाठीची वयोमर्यादा ६ वर्षे निश्चित केलेली होती. तथापि, ५ वर्षे पूर्ण झालेले बालक इयत्ता १ ली मधील प्रवेशासाठी पात्र राहतील, असे आदेशात नमूद केले होते. राज्यात राज्य मंडळाचा अभ्यासक्रम राबविणाऱ्या शाळा, सी.बी.एस.ई., आय.सी.एस.ई., आय.बी. अशा विविध प्रकारच्या शाळा आहेत. सदर सर्व प्रकारच्या शाळांमध्ये प्रवेशाच्या वेळेस इयत्ता १ ली साठी वेगवेगळी वयोमर्यादा वेगवेगळ्या दिनांकास ग्राह्य धरुन प्रवेश दिले जात होते. तसेच पूर्व प्राथमिकसाठी वर्गातील प्रवेशासाठी निश्चित अशी वयाची अट अस्तित्वात नव्हती. या बाबी विचारात घेऊन यामध्ये एकवाक्यता आणण्यासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी शिक्षण संचालक (प्राथमिक) यांच्या अध्यक्षतेखाली एकसदस्यीय समिती नियुक्त करण्यात आली होती. सदर समितीने दिलेल्या शिफारशीनुसार शासन निर्णय दिनांक २१/०१/२०१५ व दि.२३/०१/२०१५ च्या शुध्दीपत्रकान्वये ३१ जुलै हा मानिव दिनांक गृहीत धरुन बालकाचे किमान वय पूर्व प्राथमिक (इयत्ता १ ली पूर्वीचा ३ रा वर्ग) (प्ले-ग्रुप/नर्सरीसाठी) साठी ३ वर्षे पूर्ण व इयत्ता १ ली साठी ६ वर्षे पूर्ण असे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. शासन निर्णय दि.२५/०१/२०१७ अन्वये

शाळा प्रवेशासाठी ३० सप्टेंबर हा मानिव दिनांक घोषित करण्यात आलेला आहे. तसेच शासन निर्णय दि.२५/०७/२०१९ अन्वये शाळा प्रवेशासाठी बालकांच्या किमान वयामध्ये जास्तीत जास्त १५ दिवसांची शिथिलता देण्याचे अधिकार मुख्याध्यापकांना देण्यात आले आहेत.

शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.१८/०२/२०२० रोजीच्या पत्रान्वये बालकांच्या किमान वयामध्ये शिथिलता आणण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन शाळा प्रवेशासाठी बालकांच्या किमान वयामध्ये शिथिलता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

सदर शासन निर्णयान्वये पूर्व प्राथमिक व इयत्ता १ ली मधील शाळा प्रवेशासाठीचे किमान वय खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | प्रवेशाचा वर्ग | किमान वय वर्ष | वयाबाबत मानिव दिनांक | अंमलबजावणी वर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | प्ले ग्रुप / नर्सरी (इ.१ ली पूर्वीचा ३ रा वर्ग) | ३+ | ३१ डिसेंबर | २०२१-२२ पासून |
| २ | इयत्ता १ ली | ६+ | ३१ डिसेंबर | २०२१-२२ पासून |

२. सदर आदेश राज्यातील सर्व प्रकारच्या, सर्व व्यवस्थापनाच्या शाळांना लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१८१६१११९५२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.09.18 16:12:27 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई यांचे खाजगी सचिव
३) मा.सभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव
५) मा.मंत्री, शालेय शिक्षण, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण, मंत्रालय, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई यांचे खाजगी सचिव
८) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
९) सर्व मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, विधानभवन,मुंबई
१०) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई
११) मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
१२) मा.आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, चर्नी रोड, मुंबई
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, सर्व
१५) सर्व आयुक्त, महानगरपालिका
१६) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१७) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) विभागीय शिक्षण उपसंचालक, सर्व
१९) एन.आय.सी., पुणे
२०) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर शिक्षण)/प्रशासन अधिकारी, महानगरपालिका/नगरपालिका/कटक मंडळे) सर्व
२१) गटशिक्षणाधिकारी, पंचायत समिती, सर्व
२२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने)
२३) निवडनस्ती (कार्यासन- एसडी-१)